**सहायक संचालक, (रेशीम) पदावर**
**पदोन्नतीने नियुक्ती..**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन आदेश क्रमांक: आस्था-२०१८/प्र.क्र.८२/रेशीम कक्ष**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- ५ जानेवारी, २०१९

**शासन आदेश:-**

रेशीम संचालनालयांतर्गत रेशीम विकास अधिकारी श्रेणी-१, गट-ब संवर्गातील श्री. विनित सुरेश पवार यांना, सहायक संचालक, (रेशीम) गट-अ, या संवर्गात खालील अटींच्या अधिन राहून तात्पुरती पदोन्नती देण्यात येत असून पदोन्नतीनंतर त्यांची पदस्थापना सहायक संचालक (रेशीम), पुणे या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

२. मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र. २७९७/२०१५ मध्ये दि.४.८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयान्वये पदोन्नतीमधील आरक्षण अवैध ठरविले आहे. मा. उच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या विरोधात राज्य शासनाने मा. सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६ /२०१७ दाखल केली आहे. सदर याचिका अद्याप प्रलंबित आहे. याबाबत विधी व न्याय विभागाने दि.२८.१२.२०१७ रोजी, खुल्या प्रवर्गातील कर्मचाऱ्यांना पदोन्नती देण्यास कोणतीही वैधनिक अडचण नसल्याचे, अभिप्राय दिले आहेत. त्यानुसार तूर्तास पदोन्नतीच्या कोटयातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात सेवाज्येष्ठतेनुसार मा. सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधीन राहून भरण्यात यावीत. अशी कार्यवाही करताना सेवाजेष्ठता यादीमधील मागासवर्गीय अधिकारी /कर्मचारी यांना पदोन्नती देण्यापूर्वी ते दि. २५.०५.२००४ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार आरक्षणाचा लाभ मिळून सेवाज्येष्ठता यादीत वरच्या स्थानावर आले नाहीत, याची खात्री प्रत्येक प्रशासकीय विभागाने करावी अशा सूचना सा.प्र.वि. का./ का.- १६-ब ने दि.२९.१२.२०१७ च्या पत्रान्वये दिल्या आहेत.

३. त्यानुसार श्री. विनित सुरेश पवार यांची सहायक संचालक पदावरील तदर्थ पदोन्नती मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ च्या अधिन देण्यात येत असून पदोन्नतीच्या कोटयातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात देण्यात येत आहे. तसेच सदर पदोन्नती खालील अटीच्या अधीन राहून सदर पदोन्नती देण्यात येत आहे:-

१) सदरची पदोन्नती ही प्रशासकीय निकड म्हणून तात्पुरत्या स्वरूपातील तदर्थ पदोन्नती राहील. या तदर्थ पदोन्नतीमुळे संबंधित अधिकाऱ्यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच सेवाज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.
२) सदर अधिकाऱ्यांची सहायक संचालक पदावरील तदर्थ पदोन्नती सदर अधिकाऱ्यांविरूध्द आदेशाच्या दिनांकापर्यंत कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी सुरू झालेली नाही, या धारणेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

३) सदर तदर्थ पदोन्नती मुंबई उच्च न्यायालयात प्रलंबित असलेल्या रिट याचिका क्रमांक २७९७/२०१५ व ८४५२/२००४ तसेच यासंदर्भातील इतरही प्रलंबित असलेल्या न्यायालयीन प्रकरणाच्या अंतिम निकालाच्या अधिन राहील.

४) सदर पदोन्नती तात्पुरती व मा.सर्वोच्च न्यायालयात प्रलंबित असलेल्या विशेष अनुमती याचिका डायरी क्रमांक ३३१५१/२०१७ तसेच यासंदर्भातील इतरही प्रलंबित असलेल्या न्यायालयीन प्रकरणाच्या अंतिम निकालाच्या अधिन राहील.

५) सदर पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधिन राहील .

४. सदर आदेश तात्काळ अंमलात येत आहेत. रेशीम विकास अधिकारी श्रेणी-१, बीड या पदाचा कार्यभार अन्य अधिकारी यांच्याकडे सोपवून श्री. विनित सुरेश पवार, यांना सहायक संचालक, पुणे पदावर रुजू करुन घेण्याबाबतची कार्यवाही संचालक (रेशीम) यांनी तात्काळ करावी. याबाबत केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा सांकेतांक २०१९०१०७१३१६३११८०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ashish Anaclet Lopes

Digitally signed by Ashish Anaclet Lopes
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Operation Marketing And Textiles Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=97c1663938db95bf4b157b5906fb45b17fdf64e8db800c9618de046d6e51497c, serialNumber=4c69f8b7f13f76b97aa93b0d155291c61823c6e1d678a555f6eb04d1a38750cf, cn=Ashish Anaclet Lopes
Date: 2019.01.07 13:22:06 +05'30'

**( आ.अ. लोपिस )**

**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. संचालक(रेशीम), रेशीम संचालनालय, प्रशासकीय इमारत क्र.२,६ वा माळा, आयुक्त कार्यालय परिसर, नागपूर-४४०००१.
२. श्री.विनित सुरेश पवार, जिल्हा रेशीम विकास अधिकारी श्रेणी-१, बीड (संचालक (रेशीम) यांच्या मार्फत)
३. सहायक संचालक (रेशीम ), औरंगाबाद
४. जिल्हाधिकारी, जिल्हा पुणे /बीड
५. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा पुणे/ बीड